शिधावाटप / रास्त भाव दुकानांच्या
स्थलांतरणाबाबत मार्गदर्शक सूचना.

**महाराष्ट्र शासन**
**अन्न, नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभाग**
**शासन परिपत्रक क्रमांक: राभादु-२०२१/प्र.क्र.३६९/ना.पु.३१.**
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२
दिनांक : ०२ फेब्रुवारी, २०२२.

**प्रस्तावना :**

शिधावाटप / रास्त भाव दुकानांच्या मंजुरीसाठी जाहिरनामा काढल्यानंतर भविष्यात प्राधिकारपत्रामध्ये मंजूर केलेल्या जागेमध्ये दुकान चालविणे शक्य नसल्यास जागा/पत्ता बदलून देणेबाबत कोणत्याही मार्गदर्शक सूचना नसल्याने दुकानाची जागा बदलून द्यावी किंवा कसे याबाबत राज्यातील क्षेत्रिय अधिकाऱ्यांना अडचण निर्माण होत असल्याचे शासनाच्या निदर्शनास आले आहे.म्हणून शिधावाटप / रास्त भाव दुकानांच्या स्थलांतरणाबाबत मार्गदर्शक सूचना देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन परिपत्रक**

१. शिधावाटप / रास्त भाव दुकान ज्या जागेत आहे ती जागा पुढीलप्रमाणे नमूद अपरिहार्य कारणास्तव सोडावी लागल्यास / सोडणे भाग पडल्यास त्याच कार्यक्षेत्रात/नजीकच्या भागात रास्त भाव दुकानाचे स्थलांतर करता येईल -

- शासकीय कारणास्तव ( भूसंपादन, नवीन योजना, अतिक्रमण इ.)
- नैसर्गिक आपत्तीमुळे जागेची हानी झाल्यास
- दुकानाची इमारत जुनी/जीर्ण झाल्यास/मोडकळीस आल्यावर करावी लागणारी डागडूजी

२. रास्त भाव दुकान त्या त्या क्षेत्रात राहणाऱ्या शिधापत्रिकाधारकांच्या सोयीसाठी आणि त्यांना शिधाजिन्नस घेण्यास दूर जावे लागू नये, म्हणून त्याच क्षेत्रात एकांक संख्येनुसार मंजूर केली जातात.

३. रास्त भाव दुकान स्वतः च्या जागेत आहे की भाडेतत्वावरील जागेत आहे हा मुद्दा विचारात न घेता संबंधित रास्त भाव दुकानदाराकडील शिधापत्रिकाधारकांची सोय हा मुद्दा विचारात घेणे गरजेचे आहे.

४. रास्त भाव दुकानाची जागा दुकानदारांच्या वैयक्तिक (जागेचा करार संपुष्टात येणे इ.) परंतु अपरिहार्य कारणास्तव खाली करावी लागत असल्यास सदरचे दुकान केवळ त्याच कार्यक्षेत्रातील/प्रभागातील/भागातील जागेत स्थलांतर करण्यात येईल.

५. भाडेतत्वावरील जागेत असणारे रास्त भाव दुकान खाली करावे लागत असल्यास संबंधित शिधावाटप/रास्त भाव दुकानदाराने त्यांना रास्त भाव दुकानाचे प्राधिकारपत्र ज्या क्षेत्रासाठी मंजूर करण्यात आला आहे, त्याच क्षेत्रातील अन्य पर्यायी जागेत रास्त भाव दुकानाची व्यवस्था स्वतः करावी.

६. रास्त भाव दुकानाचे प्राधिकारपत्र मंजूर करताना तपासणी झालेली जागा/दुकानाची इमारत भविष्यात बदलावि लागत असल्यास त्या नविन स्थलांतरित जागेची/दुकानाच्या इमारतीची देखील पुन्हा संबंधित अधिकारी यांच्यामार्फत योग्य निकषांनुसार तपासणी करून सदर तपासणीचा **"स्थळ पाहणी अहवाल"** अहवाल संबंधित उपनियंत्रक शिधावाटप/जिल्हा पुरवठा अधिकारी/अन्नधान्य वितरण अधिकारी यांच्याकडे सादर करावा.

७. स्थळ पाहणी अहवालानुसार नविन स्थलांतरित जागा किंवा नविन दुकानाची इमारत योग्य आढळल्यास परवाना प्राधिकारी म्हणून उपनियंत्रक शिधावाटप/जिल्हा पुरवठा अधिकारी/अन्नधान्य वितरण अधिकारी यांनी दुकानाच्या त्याच कार्यक्षेत्रातील अन्य जागेतील स्थलांतरणास परवानगी द्यावी.

८. रास्त भाव दुकानाचे असे १०० ते १५० मीटर अंतरापर्यंत स्थलांतरण करताना हे १०० ते १५० मीटर अंतर त्याच कार्यक्षेत्रात/भागात असणे आवश्यक राहील.

९. सदर शासन परिपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आले असून त्याचा संकेतांक २०२२०२०२१२५०४३६९०६ असा आहे. हे शासन परिपत्रक डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Digitally signed by GAJANAN RAMDAS DESHMUKH
Date: 2022.02.02 12:51:58 +05'30'

**( गजानन रा. देशमुख )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन.**

**प्रति,**

१) मा. मंत्री, अन्न नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण यांचे खाजगी सचिव.
२) मा. राज्यमंत्री, अन्न नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण यांचे खाजगी सचिव.
३) सचिव, अन्न, नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभाग यांचे स्वीय सहायक.
४) नियंत्रक शिधावाटप व संचालक नागरी पुरवठा, मुंबई.
५) सर्व उप आयुक्त (पुरवठा).
६) सर्व उप नियंत्रक शिधावाटप.
७) सर्व जिल्हा पुरवठा अधिकारी.
८) सर्व अन्नधान्य वितरण अधिकारी.
९) निवड नस्ती, ना.पु.३१.